मौजे किन्हाळमाकडी, ता.जि.नागपूर येथील पुनर्वसित भागात नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१६/२९७/प्र.क्र.९९/र-१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २९/०९/२०१८

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एफएलडी ४९००/प्र.क्र.९७/र-१२, दि.६.८.२००४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एफएलडी ४९०६/प्र.क्र.३५/र-१२, दि.३०.७.२००९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
५) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
६) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र: विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२, दि. १६/१२/२०१५
७) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
८) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा/कार्या-७(३)/प्र.क्र.-५०/०४, दि.२३.७.२०१८
९) शासनपत्र, महसूल व वन विभाग क्र.पुनर्व-२०१६/२९७/प्र.क्र.९९/र-१२, दि.७/८/२०१८
१०) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.मशा/कार्या-७(३)/प्र.क्र.-५०/०४, दि.४.९.२०१८

प्रस्तावना -

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.६.९.२००४ अन्वये, पूरग्रस्तांचे पुनर्वसन या योजनेखाली मौजे किन्हाळमाकडी, ता.जि.नागपूर या गावातील एकूण १५९ घरांचे पुरग्रस्त म्हणून पुनर्वसन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.३०.७.२००९ अन्वये, मौजे किन्हाळमाकडी, ता.जि.नागपूर या गावातील पुनर्वसित भागात नागरी सुविधा पुरविण्यासाठी रुपये ६९,२७,१७५/- निधी मंजूर केला होता. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भ क्र.८, येथील पत्रान्वये सदर पुनर्वसित भागातील नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला. सदर प्रस्तावातील असलेल्या त्रुटींची पुर्तता करण्याबाबत संदर्भ क्र.९ येथील शासनपत्रान्वये कळविण्यात आले. त्यास अनुसरुन विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भ क्र.१० येथील दि.२३.७.२०१८ अन्वये, त्रुटींची पुर्तता करुन शासन मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे.

२. याबाबत संदर्भाधिन क्र. ५ व ७ च्या शासन निर्णयांन्वये वित्त विभागाकडून वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक ते पाच अंतर्गत प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये वेळोवेळी सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांनुसार व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजुरी धरुन) मान्यता देण्याबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार, पुनर्वसन धोरणानुसार देय नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

**मौजे किन्हाळमाकडी, ता.जि.नागपूर या गावातील पूर पुनर्वसित भागामधील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद ०३ नागरी सुविधा कामांच्या एकूण रू. २,५७,७९,६४०/- (अक्षरी रूपये दोन कोटी सत्तावन्न लक्ष एकोणऐंशी हजार सहाशे चाळीस फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

१) प्रस्तावात समाविष्ट असलेल्या कामांकरिता गौण खनिज स्वामित्वधनाची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित कार्यन्वयीन यंत्रणेची राहील.

२) शासन निर्णय क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१ दि.१/८/२००९ व दि.२८/३/२०११ अन्वये पुनर्वसित/विस्तारीत गावठाणातील नागरी सुविधा पुरविण्यासाठी निर्धारित करण्यात आलेल्या भौतिक मानकांनुसार काम करुन घेण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता यांची राहील.

३) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांवर होणारा खर्च मंजूर अंदाजपत्रकापेक्षा/विहीत मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांसाठीच्या अंदाजपत्रकांत दर्शविलेली कामनिहाय रक्कम तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेनुसार असावी. तांत्रिक व प्रशासकीय मान्यतेतील अटींचे विहीत कार्यपध्दतीनुसार पालन होईल, याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तीचे पुनर्वसन अधिनियम १९९९ मधील कलम १८ अन्वये प्रस्तावाधीन नागरी सुविधा सर्व दृष्टीने पूर्ण झाल्यावर व त्याप्रमाणे जिल्हाधिकारी, नागपूर यांचेकडून प्रमाणपत्र घेतल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेकडे तातडीने हस्तांतरित कराव्यात.

६) प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांचा उचित दर्जा राखला जाईल, याची प्रकल्पयंत्रणेने दक्षता घ्यावी.

२. <u>निविदा प्रक्रिया व कार्यारंभ आदेश :-</u>

**अ)** कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रस्तुत प्रशासकीय मान्यता आदेशांतील अटींची पूर्तता करुन प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया तात्काळ सुरु करावी.

**ब)** प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांच्या निविदा प्रक्रियेस संबंधित पाटबंधारे विकास महामंडळ यांचेकडून पूर्वपरवानगी व मान्यता घेण्याची आवश्यकता असणार नाही.

**क)** प्रस्तावाधीन पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी देण्यात येणार असल्यामुळे निविदा स्वीकृतीनंतर कार्यारंभ आदेश देण्यासाठी, संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून निविदा सांकेतांक घेण्याची आवश्यकता नाही.

**ड)** कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नागपूर यांनी प्रस्तावाधीन नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर निविदा प्राप्त कामांसाठीचे कार्यारंभ आदेश देऊन नागरी सुविधा कामे तात्काळ सुरु करावीत.

३. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नागपूर यांनी वरील क्र. २ नुसार सुरु करण्यात आलेल्या निविदा प्राप्त नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल ( Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०१८-२०१९ या चालू वित्तीय वर्षाच्या उर्वरित कालावधीत निविदा प्राप्त कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार " मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी. सदर निधी मागणीसोबत यापूर्वी या कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोजन प्रमाणपत्रे (Utilisation Certificates) प्राथम्याने सादर करावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२९१५०४३१०४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.09.29 15:09:28 +05'30'

( द.शं.मुंजाळे )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) नागपूर विभाग, नागपूर.
२. उप आयुक्त (पुनर्वसन), नागपूर.
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, नागपूर.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
५. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नागपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१/पी.ए.सी.,मंत्रालय, मुंबई ३२.
११. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*****

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: पुनर्व-२०१६/२९७/प्र.क्र.९९/र-१२, दि.२९/०९/२०१८ सोबतचे विवरणपत्र**

**मौजे किन्हाळमाकडी, ता.जि.नागपूर या पुनर्वसित भागामधील प्रशासकीय मान्यता प्रदान एकूण ०३ नागरी सुविधा कामांचा तपशील.**

| अ.क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | किन्हाळमाकडी | अंतर्गत खडीचे रस्ते (२.७० कि.मी.) व मुख्य डांबरी रस्ता बांधकाम (०.५०० कि.मी.) | ९९,८६,५००/- |
| २ | किन्हाळमाकडी | सिमेंट कॉंक्रीट नाली बांधकाम (२.७० कि.मी.) | ९९,९८,८००/- |
| ३ | किन्हाळमाकडी | नागरी सुविधांच्या इमारती बांधकामे समाज भवन, प्रवासी निवारा, स्मशानभूमी शेड, सार्वजनिक शौचालय, गुरांसाठी पिण्याच्या पाण्याचा हौद, सी.डी.वर्क इत्यादी | ५७,९४,३४०/- |
| | | **एकूण** | **२,५७,७९,६४०/-** |

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: CN = Dayanand S Munjale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Revenue And Forest Department
Date: 2018.09.29 15:09:42 +05'30'

**( द.शं.मुंजाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

******